# जंगलाची राणी

कांस्टेंटाईन

मराठी : अश्विनी बर्वे

*खूप पूर्वी भारतात, कृष्ण नावाच्या एका छोट्या मुलाला आपल्या दरवाज्यात एक वाघाचं पिल्लू मिळालं. त्याने त्याला आपल्या घरात पाळलं, आणि मग दोघं पक्के मित्र झाले.*

*पण नंतर राणी एक सुंदर वाघीण झाली. जी स्वातंत्र्यासाठी अस्वस्थ होती हे माहित असूनही की पाळीव प्राणी आता तो ठेवू शकत नाही कृष्ण ,राणीला महालाच्या बागेत घेवून गेला. तरीपण वाघीण आपल्या मुक्ततेसाठी बैचेन होती. एक दिवस काहीतरी अनपेक्षित घडलं – आणि राणी शेवटी जंगलची राणी झाली.*

खूप पूर्वी भारतात कृष्ण नावाचा एक छोटा मुलगा राहत होता.

तो आपल्या आईवडिल आणि काही नोकरांबरोबर एका मोठ्या जुन्या घरात राहत होता.घराचे नाव "जेंटल हाउस" होतं. आणि ते एका नदीच्या किनारी, उंचावर एका डोंगरावर एकच होतं.

"जेंटल हाउस" च्या चारी बाजूला गवत,एका गालीच्यासारखे पसरलेले होते. इथं कृष्ण आपल्या इतर मित्रांबरोबर खेळत असे. छोटे-छोटे जीव-जंतु "जेंटल हाउस“च्या आसपास आपले घर बनवत असत.

कृष्णाला भितीदायक,काटेरी अळी, मखमली गुणगुणणारी मधमाशी खूप आवडत. पण कोणत्याही गोष्टी पेक्षा त्याला जंगलातला खऱ्या प्राण्याला आपला मित्र बनवायचे होते.

उन्हाळ्यात सकाळच्या वेळी जेव्हा सूर्य जंगलात सोन्याच्या कानातल्या सारखा लटकत असे, तेव्हा कृष्ण जंगली आणि मुक्त फिरणाऱ्या प्राण्यांचा आवाज ऐकत असे.आणि जेव्हा सूर्य आकाशात उंच असे तेव्हा कृष्ण पहाडावरून उतरून जंगलात जायला आणि मित्र शोधण्याची योजना आखत असे.

पण तिथं जाण्यासाठी कृष्णाला नेहमी आपले वडील,आई आणि जेंटल हाउसच्या नोकरांची परवानगी घ्यावी लागत असे.

“थांब,“ त्याची आई म्हणत असे. “थांब” त्याचे वडील म्हणत असत. “थांब” जेंटल हाउसचे नोकर म्हणत.

“जोपर्यंत तू मोठा होत नाहीस तोपर्यंत तुला वाट बघावी लागेल.”

पण आता तो वाट बघून-बघून थकला होता.म्हणून तो सूर्य अस्ताला गेल्यानंतर लगेचच जेंटल हाउस मध्ये झोपायला गेला.

रात्री कृष्णाला जाग आली. मग तो खिडकीजवळ गेला. तिथं अंधारात त्याला एक म्हातारा संन्यासी दिसला, ज्याच्याजवळ एक छोटंसं गाठोडं होतं. जेंटल हाउसच्या दरवाज्याकडे येणारा तो संन्यासी थकलेला आणि धुळीने माखलेला वाटत होता.

त्याने घंटा वाजवली नाही, तो एक शब्द बोलला नाही. त्याने गाठोडं दरवाज्याजवळ ठेवलं आणि मग अंधारात तो गायब झाला.

दिव्याच्या प्रकाशात कृष्णाला गाठोड्यात काही हलतांना दिसलं. त्याला धुळीने भरलेल्या चादरीतून कोणाचं तरी फुसफुस ऐकू आली.

लगेचच कृष्ण जेंटल हाउसमध्ये पळत गेला आणि त्याने आपल्या आई-वडील आणि नोकरांना उठवलं. मैं

"लवकर या आणि बघा की तो साधू दरवाज्याच्या पायऱ्यांवर काहीतरी ठेवून गेला आहे," त्याने त्यांना विनंती केली की, "कृपया लवकर या."

लगेचच रात्रीचे दिवे लावले गेले. जेंटल हाउसच्या आतला प्रकाश पायऱ्यावर ठेवलेल्या गाठोडयावर पडला.

कृष्ण वाकला आणि त्याने धुळीने भरलेले गाठोडे उघडले.त्यात वाघाचे एक छोटं पिल्लू होतं आणि ते ओरडण्याचा प्रयत्न करत होतं.

"ते एक खूप छोटं पिल्लू आहे," कृष्णच्या आईने समजावलं. "त्याचे डोळे अजूनही बंद आहे आणि त्याच्या चेहऱ्यावर अजूनही खूप सुरकुत्या आहेत."

"मी याला ठेवून घेवू शकतो का?" कृष्णने विनंती केली.

"हो," त्याची आई म्हणाली. "हो," वडील म्हणाले.

"हो" जेंटल हाउसचे नोकर म्हणाले.

"तू याला तोपर्यंत ठेवू शकतो जोपर्यंत तो मोठा होत नाही."

वाघाच्या पिल्लाचे जीवन जेंटल हाउसमध्ये खुशीचे आणि आश्चर्याने भरलेले होते. हळूहळू ते मोठं-मोठं होत होतं. कृष्णचे जीवन सुद्धा आनंद आणि आश्चर्याने भरलेले होते.रोजचा दिवस त्याच्यासाठी काहीतरी नवीन घेवून येत होता. काहीतरी अद्भुत.

एक दिवस छोट्या वाघाचे डोळे पूर्ण उघडले. वाघाच्या पिल्लाने प्रथमच कृष्ण आणि जेटल हाउसचे पडदे आणि गालिच्यांनी भरलेली दुनिया बघितली. तिथली दुनिया वस्तूंनी भरलेली होती..

त्या दिवशी सकाळी कृष्ण, वाघाच्या पिल्लाला बाग दाखवण्यासाठी घेवून गेला. गरम हवेमधून मातीचा गोड सुगंध येत होता.

छोट्या पिल्लासाठी ते एक अजब दृश्य होते, अजब गंध होता.आणि कृष्ण सुद्धा त्याच्यासाठी काहीसा अजब होता. एक साधू तलावातल्या पाण्यातून काहीतरी गोळा करत होता..

साधु मंदिराकडे जात होता आणि वाहण्यासाठी कमळाची फुलं त्याला हवी होती. त्याने आपली काठी जमिनीवर ठेवली आणि मग तो वाघाच्या पिल्लाचे डोकं कुरवाळण्यासाठी खाली वाकला.

“बघ, ती किती सुंदर आहे,” तो हळू आवाजात कुजबुजला. “ओह, खूप सुंदर, माझी जंगलाची राणी!”

मग त्याने कृष्णकडे बघितले आणि म्हटले, “
तिला राणी म्हटलं जाईल, राणी.
आणि ती जंगलाची राणी होईल.”

लांबवर मंदिराची घंटा वाजत होती.अचानक हवेत एक अजब संगीत ऐकू येवू लागले.जंगलातले पक्षी गाऊ लागले, मधमाश्या गुणगुणू लागल्या.

उंच झाडांवरून गरम हवा वाहत होती आणि त्यातून साधूचा कोमल आवाज घुमत होता.

"ती जंगलाची राणी होईल."

उन्हाळा संपला आणि
गरम,उन्हाच्या दिवसानंतर
पावसाळा आला. जंगली हवेने
माती चारी बाजूला उडवली आणि
सगळ्या जीवित वस्तूंना आपल्या
लपेटून घेतले...

पावसाच्या या मोठ्या दिवसाच्या काळात, राणी आणि कृष्ण एकमेकांच्या बरोबर घरात राहत होते. ते नरम गालिच्यावर चालायला शिकले.ते पडद्याच्या मागे लपाछपी खेळत असत, आणि जेंटल हाउसच्या बनावटी जंगलात एक-दुसऱ्याचा पाठलाग करत असत.

कधी राणी, रेशमी उश्यांवर आपले पंजे पसरत असे. कधी-कधी ती गुरगुरे आणि तेव्हा जेंटल हाउस मध्ये जंगलातले आवाज घुमत असत.आणि कधी कधी ती खाली जंगल बघण्यासाठी खिडकीतून उडी मरे.तिने पावसात संपूर्ण बागेचा आनंद घेतला.मैं

एका सकाळी, जेव्हा कृष्ण आणि राणी एकमेकांबरोबर अंथरुणात झोपले होते. सूर्याची किरणं खिडक्यांमधून डोकावत हटी.बाहेर कबुतरं घु-घुर करत होती.माळ्याच्या कात्रीचा झाडं कापतांनाचा आवाज येत होता.

उंच उंच झाडांमधून हळू-हळू हवा वाहत होती आणि पाऊस गायब झाला होता. आणि परत एकदा हवा उन्हाने चमकायला लागली.जसे कृष्ण आणि राणी यांना जाग आली आणि त्यांनी सूर्याकडे बघितलं, ते बरोबरच बाहेर पळाले. त्यांनी जेंटल हाउस जवळून जाणाऱ्या शक्तिशाली नदीकडे बघितलं.

आणि मग खाली जंगलातून आवाज आला.खळाळणाऱ्या नदीचा आवाज जबरदस्त होता. जंगलातले हे आवाज त्याला बोलावत होते का?

राणीने ते आवाज ऐकले आणि ते लक्षपूर्वक ऐकण्यासाठी उभी राहिली.मग ती पहाडावरून उंच जेंटल हाउसपर्यंत येणाऱ्या आवाजांना ती उत्तर देवू लागली.

कृष्णला आश्चर्य वाटलं. त्याच्या आईने विचार केला, त्याच्या वडिलांनी विचार केला.नोकरांना सुद्धा खूप आश्चर्य वाटलं. राणीची जंगलात परत जाण्याची वेळ झाली होती का?

काळ पुढे जात होता.एक दिवस पाऊसात कृष्ण दरवाज्यासमोर राणी बरोबर खेळत होता. गायीचे दूध काढण्याची वेळ होती. गोधूलि का समय था. प्रवेशद्वारा वर रॉकेलचा दिवा पेटवलेला नव्हता.पूर्ण बागेत मात्र काजवे चमचमत होते,तेवढ्यात तिथं तोच साधू प्रकट झाला. त्याच्याजवळ आपली काठी आणि काही फुलं होती. तो जेंटल हाउसकडे येत होता जिथं कृष्ण आणि राणी खेळत होते.

"राणी आता खूप मोठी होत आहे," साधू म्हणाला. "हे घर आता तिच्यासाठी छोटे आहे. आता तिला त्या महालात जाऊन राहायला हवं, जिथून नदी वाहत जाते. "

मग अंधार झाला आणि संन्यासी निघून गेला आणि कृष्ण दरवाज्यातच बसला आणि उदास होत राणीकडे बघू लागला. राणीने गुरगुर केली नाही की उड्या मारल्या नाही. ते गुपचूप दरवाज्यातच झोपली आणि कृष्ण तिच्या बाजूला बसला.तो तिला जवळ घेण्यासाठी खाली वाकला आणि त्याने तिचे गाल कुरवाळले.

थोड्यावेळाने कृष्णचे आईवडील आणि जेंटल हाउसचे नोकर राणीला नदीच्या किनारी असणाऱ्या राजाच्या महालात घेवून गेले. तो बागेने वेढलेला एक छानसा महाल होता. तिथल्या बागा मोठ्या रुंद जंगला सारख्या होत्या.

कृष्णने राजाचा महाल आणि चारीबाजुला फुललेल्या बागेच्या बाबत कितीतरी गोष्टी ऐकल्या होत्या. त्याने ऐकलं होतं की राजाला आपल्या घरातल्या जंगलात राहण्यासाठी एक मोठं जंगली जानवर हवं होतं.

आणि मग राणी नदीच्या किनारी राजाच्या महालात राहण्यासाठी गेली. इथं ती रडत आणि ओरडत होती,जशी ती नदीच्या किनाऱ्याच्या खऱ्या जंगलात राहत होती. इथं ती घराच्या भिंती आणि गालिच्यापासून मुक्त दुनियेत स्वतःची काळजी कशी घ्यायची हे ही ती शिकली.

दिवसानंतर दिवस जात होते. खूप गरम होत होते. तेव्हा आकाशात ढग दिसू लागले. पण एक दिवस हवा जोरात वाहू लागली.त्यामुळे गवतात एक फुसफुस ऐकू आली आणि त्यामुळे धुळीच्या छोट्या-छोट्या कणांनी जेंटल हाउसच्या चारी बाजूला चकरा मारल्या.

त्या रात्री आकाशात काळे ढग जमा झाले.मग विजा चमकल्या आणि तिने जोरात येणाऱ्या पावसाला आव्हान दिले.

आता गरमी संपली होती. परत जंगली हवा सुरु झाली होती, आणि जेंटल हाउसच्या चारी बाजूला गडगडाट झाला.आकाशात वीज चमकली आणि मग पावसाचे थेंब पडू लागले.इतक्या जोरात, एवढ्या लांब धारा पहिले कधी पडल्या नव्हत्या.

कितीतरी दिवस कृष्ण जेंटल हाउसच्या आतच, जिथं सगळं काही शांत आणि एकाकी होतं. कधी-कधी तो आपली बासरी वाजवत असे. कधीकधी तो हवा आणि पावसाचा आवाज ऐकत असे.

पण जेव्हा पाऊसात भिजणारे जंगल तो बघे तेव्हा त्याला राणीच्या बाबत आश्चर्य वाटे. तो तिच्याबद्दल, महालाच्या बागेबद्दल विचार करत असे. जिथून एक प्रचंड नदी वाहत होती.

मग एक दिवस सकाळ होण्याच्या आधी अंधारात,वादळ थांबलं.पाऊस थांबला आणि हवा शांत झाली. उन्हाच्या दिवसांची आठवण देण्यासाठी केवळ हळूवार,कोमल वाऱ्याची झुळूक वाहत होती.

जेव्हा कृष्ण त्या सकाळी उठला तेव्हा आकाशात सूर्य चमकत होता आणि शांत हवेत पाण्याचा आवाज जोरात येत होता.

पावसाच्या पाण्याने भरलेल्या बागेत कृष्ण गुपचूप उभा होता. जंगली, वादळाच्या भूमीवर आता एक मोठी शांतता पसरली होती.गवत हवेत डोलत होते आणि आकाश स्वच्छ होते.

पण जेव्हा कृष्णने खाली जंगलाकडे बघितले. तर तिथं पूर आलेली नदी वेगाने वाहत होती.

नदी वेगाने खळाळत होती.त्याने एवढा पूर कधी आधी पहिला नव्हता. ती जंगलातून येवून आकाशाच्या क्षितिजापर्यंत लांब चांदण्यासारखी पसरली होती.नदीच्या किनाऱ्यावरचे सगळी झाडं पाण्यात वाकले होते. चक्राकार लाटांसहित खूप सारी कमळाची फुलं पाण्याच्या भोवऱ्यात तरंगत होते.तेव्हा कृष्णने नदी मध्ये राणीला बघितलं..

त्याचं हृदय एक क्षण थांबलं आणि तो ओरडला, "राणी!राणी!" नदीच्या गर्जनेपुढे त्याचा आवाज म्हणजे एक क्षीण हाक होती.

राणी पाण्यात आपलं डोकं वर करून कमळाच्या फुलांमधून पोहत होती. सूर्याच्या प्रकाशात कृष्णने तिचा चांगला चेहरा बघितला. राणीची नजर पहाडावरच्या उंच जेंटल हाउसवर होती.

बागेत एकटा कृष्ण उभा असल्याचे तिने पाहिले आणि विचार केला.

कृष्णने विचार केला, "राणी पुराच्या पाण्याबरोबर, महालाच्या भिंतीमधून जंगलाच्या खळाळत्या नदीत आली असेल."

राणी, कमळांच्या फुलांबरोबर पोहत राहिली.
तिने जेंटल हाउस पार केले आणि तिने
जंगलाच्या हिरव्यागार दुनियेत प्रवेश केला,
जशी राणी तिथून गेली, त्याआधी गरम हवेत
एक प्रतिध्वनी ऐकू आला.
“बघा,ती किती सुंदर आहे,
खूप सुंदर आहे!
माझी जंगलाची राणी!”